**कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्या., कोल्हापूर येथील विकास कामांना लेखाशिर्ष (४२०२ ०७८५) ५४- गुंतवणुका अंतर्गत निधी खर्च करण्यास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: कोचिन-२०२५/प्र.क्र.१६/सां.का.१**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : ३० मार्च, २०२५.

**वाचा :** १) व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्या., कोल्हापूर यांचे पत्र - क्र.कोचिन/२०२५/२६, दिनांक १३ मार्च, २०२५.

२) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय.क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१०७/निओ-१, दि. २२ मे, २०२३.

३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. कोचिन-२०२५/प्र.क्र.१६/सां.का.१, दिनांक २७ मार्च, २०२५.

४) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. टीसीए १६०२०(११)/१/२०२५ (ई-१०४२११८)/अर्थसं, दिनांक २७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

उपनिर्दिष्ट ३ अन्वये, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळात भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२०२ ०७८५) ५४-गुंतवणूक या लेखाशिर्षाअंतर्गत करण्यात येणाऱ्या विविध कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रयोजनार्थ वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्या., कोल्हापूर मधील उपनिर्दिष्ट ३ मध्ये नमूद शासन निर्णयातील वेगवेगळ्या कामांना भागभांडवली अंशदान म्हणून मंजूर करण्यात आलेले सहायक अनुदान रुपये ५,१०,७१,०००/- इतक्या निधीपैकी रुपये १,२१,००,०००/- (रुपये एक कोटी एकवीस लक्ष फक्त) इतकी रक्कम कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्या., कोल्हापूर यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर येथे होणाऱ्या विविध पायाभूत सुविधांबाबतची काम करण्यासाठीची कार्यान्वयीन यंत्रणा महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ, मुंबई ही असेल.

**०३.** नियोजन विभागाचा शासन निर्णय क्रमांक ससमा-२०१०/प्र.क्र.४८ (भाग-१)/का-१४६१, दि. ११ जून, २०१८ नुसार खर्चाच्या बाबतीत केलेल्या तरतुदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराच्या अधिन राहून सदर प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.झेडडी-०५, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च (००) (०२) कोल्हापुर चित्रनगरी महामंडळाला भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२०२ ०७८५) ५४- गुंतवणुका या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा. सदरचा निधी सशर्त आहे.

**०५.** या प्रयोजनासाठी उप सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ, कोल्हापूर यांना सदर रक्कम एकरकमी वितरीत करावी. यासाठी, उप सचिव (सां.का.१) हे पर्यवेक्षिय अधिकारी राहतील.

**०६.** सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४७/२०२५/व्यय-१५, दि.२८ मार्च, २०२५ अन्वये प्राप्त मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३०१५४१३९६४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2025.03.30 15:43:15 +05'30'

**( सुमंत दि. पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, कोल्हापूर चित्रनगरी महामंडळ मर्यादित, कोल्हापूर.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पायाभूत विकास महामंडळ, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई
६. महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. नियोजन विभाग (का.१४४३), मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग (व्यय-१५, अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
११.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - यांना विनंती करण्यात येत आहे की, उक्त अनुदानाची रक्कम उपलब्ध करुन देण्यात यावी.
१२.अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी महामंडळास निधी वितरणाची कार्यवाही करावी.
१३.निवडनस्ती (सां.का.१)